**महाराष्ट्र मानव विकास मिशनकरिता पद निर्मिती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
नियोजन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:संकीर्ण-२०११/प्र.क्र.१२१/का.१४१८
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ११ नोव्हेंबर, २०११

वाचा :- १) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक: ममावि-२००६/प्र.क्र.२०/का-१४१३, दि.२९ जून, २००६.

२) शासन पत्र, वित्त विभाग, क्रमांक: पदनि-१०.१०/प्र.क्र.५५/२०१०/वित्तीय सुधारणा-१, दि.२९ जुलै, २०१०.

३) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक: माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का-१४१८, दि.१९ जुलै, २०११

**प्रस्तावना :-**

राज्यातील १२ अति मागास जिल्हयांचा मानव विकास निर्देशांक उंचावण्याकरिता संदर्भाधीन दि.२९ जून, २००६ च्या शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र मानव विकास मिशनची स्थापना करण्यात आली. आरोग्य, शिक्षण व उत्पन्न वाढ या बाबींशी संबंधीत स्थानिक गरजेनुसार विविध योजना मिशनने आपल्या कार्यक्षेत्रामध्ये १२ जिल्हयातील २५ तालुक्यांमध्ये राबविल्यामुळे संबंधीत तालुक्यांच्या मानव विकाससंबंधीच्या अनेक निर्देशांकात लक्षणीय वाढ झालेली आहे. मा. मंत्री, वित्त व नियोजन यांनी, दि.२५ मार्च, २०१० रोजी अर्थसंकल्पिय भाषणाच्यावेळी "मानव विकास" ही संकल्पना जिल्हयाऐवजी तालुकास्तरावर राबवून सदर कार्यक्रमाची व्याप्ती वाढविण्याची घोषणा केली होती. ही बाब विचारात घेऊन, महाराष्ट्र मानव विकास कार्यक्रम राज्यातील २२ जिल्ह्यांतील १२५ तालुक्यांमध्ये राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भांकित क्र.(३) अन्वये घेतला आहे.

उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.६ जुलै, २०१० च्या बैठकीत, मानव विकास कार्यक्रमासाठी पुर्वीच्या १२ जिल्हयांत मंजूर केलेल्या ४८ पदांची पुर्नरचना करण्यास व उर्वरित २१ जिल्हयांमध्ये नवीन ८४ पदे निर्माण करण्यास मान्यता मिळाली आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी यांच्याकडे सर्वसाधारण योजना, आदिवासी उपयोजना व अनुसूचित जाती उपयोजना यांच्या जिल्हा वार्षिक योजनेची जबाबदारी देण्यात आली आहे. सबब, पूर्वीच्या मंजूर कर्मचाऱ्यांवर मानव विकास कार्यक्रमाची जबाबदारी सोपविणे शक्य नसल्याने, सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकारी स्तरावर अतिरिक्त अधिकारी/कर्मचाऱ्यांची नियुक्ती करणे आवश्यक आहे.

२. सन २०११-१२ पासून मानव विकास कार्यक्रमांतर्गत ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगाव, जालना, परभणी, हिंगोली, नांदेड, बीड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या २२ जिल्हयांतील १२५ तालुक्यांचा समावेश करण्यात आला आहे. त्यासाठी या २२ जिल्हयांमध्ये जिल्हास्तरावर खालीलप्रमाणे प्रत्येकी ३ याप्रमाणे अधिकारी व कर्मचारीवृंद मंजूर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रु.) | ग्रेड पे | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| २ | संशोधन सहायक | ९३००-३४८०० | ४३०० | १ |
| ३ | सांख्यिकी सहायक | ५२००-२०२०० | २८०० | १ |
| | एकूण | - | - | ३ |

३. तसेच मानव विकास कार्यक्रमाकरीता ठाणे, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगाव, जालना, परभणी, नांदेड, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या १५ जिल्हयांतील ४ किंवा त्यापेक्षा अधिक तालुक्यांचा समावेश होत असल्याने या जिल्हयांसाठी रु.१५६००-३९१०० (ग्रेड पे ५४००) या वेतनश्रेणीतील जिल्हा नियोजन अधिकारी / उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद असे एक पद याप्रमाणे एकूण १५ पदे मंजूर करण्यात येत आहे. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे पद प्रतिनियुक्तीने ग्राम विकास विभागाच्या क्षेत्रीय अधिकारी यांच्यामधून भरण्यात येईल. जिल्हा नियोजन अधिकारी / उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद या पदांवरील खर्च विधानमंडळाच्या निदर्शनास आणल्यानंतर ही पदे भरता येतील.

४. विहीत प्रक्रियेव्दारे उपरोक्त पदांसाठी नियमित कर्मचारी उपलब्ध होईपर्यंत जिल्हाधिकारी यांनी सदरची पदे (जिल्हा नियोजन अधिकारी / उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे पद वगळता) व्यावसायिक संस्थेमार्फत आऊटसोर्सिंगव्दारे भरावीत. सदर पदांसाठी शैक्षणिक अर्हता समकक्ष पदाप्रमाणे राहिल. आऊटसोर्सिंग पध्दतीने भरावयाच्या कर्मचाऱ्यांचे मानधन व अनुषंगिक भत्ते शासनस्तरावरुन निश्चित करुन आयुक्त, मानव विकास यांचेमार्फत स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

५. जिल्हयांतर्गत गठीत करण्यात आलेल्या मानव विकास समित्यांच्या कार्यालयांकरिता लागणारी सर्व प्रकारची यंत्रसामग्री, फर्निचर, लेखन साहित्य मंजुर करण्याचे आणि त्यावर येणारा खर्च उपलब्ध होणाऱ्या आस्थापना निधीतून करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना राहतील.

६. महाराष्ट्र मानव विकास मिशनच्या कार्यालयांसाठी सन २०११-१२ या आर्थिक वर्षात येणारा खर्च "मागणी क्र. ओ-१, मुख्य लेखाशीर्ष-२०५३, जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना (०४) (०१) मानव विकास निर्देशांकात वृध्दी करणे (२०५३ १२३१), (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.६ जुलै, २०१० रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१११११११२२८२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अकृजगताप

( अ. कृ. जगताप )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपालांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव

३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव

४) मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

५) मा. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, मुंबई
६) मा. मुख्य सचिव
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
८) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९) विभागीय आयुक्त (सर्व)
१०) सह सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
११) मा. उप मुख्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव
१२) मा. राज्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव
१३) सह सचिव (का.१४२७/१४२६), नियोजन विभाग
१४) जिल्हाधिकारी (सर्व)
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६) वित्त विभाग / सामान्य प्रशासन विभाग / महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२१) उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
२२) आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद.
२३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२४) सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय (सर्व)
२५) जिल्हा नियोजन अधिकारी , जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
२६) उप सचिव (व्यय-८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७) निवड नस्ती (का-१४१८), नियोजन विभाग.